लेखानुदान सन २००९-१०
(१) मागणी क्र.बी-३
मुख्य लेखाशीर्ष ३०५६-अंतर्देशिय जलपरिवहन
(२) मागणी क्र.बी-७
<u>मुख्य लेखाशीर्ष ३०५१-बंदरे व दीपगृहे</u>

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्रमांक पीएलएन ०३०९/९२/प्र.क्र.२७/बंदरे-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : १८ ऑगस्ट, २००९

वाचा : (१) क्रमांक पीएलएन ०३०९/९२/प्र.क्र.२७/बंदरे-१, दिनांक ९ एप्रिल, २००९.
(२) क्रमांक बीजीटी १००८/३०५१/२००९-१०/प्र.क्र.९२/बीयुडी-१, दिनांक ८ जुलै, २००९.
(३) क्रमांक बीजीटी १००९/३०५६/२००९-१०/प्र.क्र.९४/बीयुडी-१, दिनांक ८ जुलै, २००९.

**<u>शासन निर्णय :-</u>**

शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक ईपीटी १०९६/प्र.क्र.१३३/परि-५, दिनांक २२ नोव्हेंबर, १९९६ अन्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची स्थापना झाल्यामुळे बंदर संघटनेमार्फत कार्यान्वित होत असलेली योजनांतर्गत व योजनेतर कामे या बोर्डामार्फत करण्यात येतात. याकरीता शासनाकडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाला अर्थसंकल्पिय अनुदान, कर्जे वगैरे देण्याची तरतुद महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम १९९६ च्या कलम ७३ अन्वये करण्यात आलेली आहे. सदर कलमाच्या तरतुदीनुसार महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान देणे शक्य व्हावे याकरीता शासन निर्णय क्रमांक पीएलएन ०६९७/सीआर ४३/परि-४, दिनांक १५.०७.१९९७ अन्वये लेखाशीर्ष ३०५१ बंदरे व दीपगृहे व ३०५६ अंतर्देशिय जलपरिवहन या लेखाशीर्षाखाली (योजनेतर / योजनांतर्गत) अनुदाने सन १९९७-९८ या आर्थिक वर्षापासून देण्याच्या दृष्टीने उपशीर्ष उघडण्यास शासनाने मंजूरी दिली आहे.

२. सन २००९-१० च्या अर्थसंकल्पास विधीमंडळाची पूर्णत: मान्यता मिळेपर्यंतचा चार महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी विधानमंडळाने महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक, २००९ मंजूर केले आहे. सदर विधेयकाचे अधिनियमात रुपांतर झाले असून ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ९ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २३ मार्च, २००९ मध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहे.

३. मुख्य लेखाशीर्ष ३०५१-बंदरे व दीपगृहे याखाली पहिल्या चार महिन्यांकरीता रुपये ७९,२६,०००/- (रुपये एकोणऐंशी लाख सव्वीस हजार फक्त) (योजनांतर्गत / दत्तमत) तसेच, मुख्य लेखाशीर्ष ३०५६-अंतर्देशिय जलपरिवहन याखाली पहिल्या चार महिन्यांकरीता रुपये ९५,९५,०००/- (रुपये पंचाण्णव लाख पंचाण्णव हजार फक्त) (योजनांतर्गत/ दत्तमत) एवढी रक्कम खर्च करण्यास विधीमंडळाने मान्यता दिलेली आहे.

४. आता सन २००९-१० च्या अर्थसंकल्पीय तरतुदीतील संपूर्ण रक्कम खर्च करण्यासाठी विधीमंडळाने महाराष्ट्र विनियोजन विधेयक २००९ (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम २००९ यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) चा अधिनियम क्रमांक १२ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २० जून, २००९ मध्ये प्रसिद्ध केला आहे.

५. उपरोक्त वाचा येथील क्रमांक (१) येथे दर्शविलेल्या शासन निर्णय दिनांक ९ एप्रिल, २००९ सोबत असलेल्या सहपत्रातील रकाना क्रमांक ४ मध्ये दर्शविण्यात आलेले अनुदान आता मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे दरमहा खर्च करण्यात यावे.

६. सदरहू शासन निर्णय हा वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अंदाज १०.०९/प्र.क्र.१५१/२००९/अर्थसंकल्प-३, दिनांक ३० जून, २००९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. ता. गौड )
सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), मुंबई
महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई (५ जादा प्रतींसह)
वित्त विभाग (व्यय-८, अर्थसंकल्प-१०, अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२
अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
कक्ष अधिकारी (बीयुडी-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
नियोजन विभाग (का.१४५२, १४५४, १४५६), मंत्रालय, मुंबई-३२
निवडनस्तीसाठी.